e3

'सिंचन सहायक' संवर्गनिर्मिती संदर्भात
अभ्यासगट नियुक्ती करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :संकीर्ण २००९/(३४६/२००९)आ(अतांत्रिक)**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २८/ १०/०९**

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागातील सिंचन व्यवस्थापन अंतर्गत पाणी वाटप व पाणीपट्टी वसुलीचे काम करणारे कालवा निरीक्षक/मोजणीदार/दप्तर कारकून या संवर्गाचे एकत्रिकरण व सुसुत्रीकरण करुन सिंचन सहायक हा एकच नवीन संवर्ग निर्मितीचा प्रस्ताव शासन विचाराधीन आहे.सदर संवर्ग निर्मिती करतेवेळी सिंचन सहायकांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये निश्चितीकरण, समावेशन धोरण, सेवाप्रवेश नियम, सेवाजेष्ठता, पदोन्नती इ. सेवाविषयक बाबींसंदर्भात काय दिशा असावी हयाबाबत सखोल अभ्यास करण्यासाठी उच्च स्तरीय अभ्यासगटाची (study group)नियुक्ती करणे संदर्भात प्रस्ताव शासनाकडून विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागातील सिंचन व्यवस्थापन अंतर्गत आस्थापनेवर असणारे कालवा निरिक्षक/मोजणीदार/दप्तर कारकून या संवर्गाचे एकत्रिकरण करुन " सिंचन सहायक''या नविन संवर्गनिर्मिती करण्यासाठी व त्याबाबतच्या सेवाविषयक बाबींचा सखोल अभ्यास करण्यासाठी शासनाने एक उच्चस्तरीय अभ्यास गट (study group) गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे. सदर अभ्यासगटाची रचना खालीलप्रमाणे आहे.

**अभ्यास गट रचना :-**

| | |
|---|---|
| १. मुख्य अभियंता (ज.सं.),जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| २. अधिक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी,पुणे सातारा,औरंगाबाद,नागपूर,अमरावती, ठाणे, नाशिक | सदस्य |
| ३. सहसचिव (सेवा) | सदस्य |
| ४. सहसचिव (आस्था) | सदस्य संचिव |

**अभ्यास गट कार्यक्षेत्र** :- जलसंपदा विभागातील सिंचन व्यवस्थापनाकरीता असलेले व वेगवेगळया प्रकारचे, निरनिराळया नावाने संबोधले जाणारे कर्मचारी असण्यापेक्षा सर्व प्रकारचे ज्ञान असलेले अष्टपैलू सहायक निर्माण करणे व सिंचन व्यवस्था प्रभावीपणे राबविणे हा हेतू " सिंचन सहायक "संवर्ग निर्मिती मागे आहे. सदर अभ्यास गट सिंचन सहायकांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये निश्चितीकरण, समावेशन धोरण,सेवा प्रवेश नियम सध्या अस्तित्वात असणाऱ्या संवर्गाबाबतचे धोरण,सेवाजेष्ठता, पदोन्नती,प्रशिक्षण कार्यक्रम वेतनश्रेणी इ.सेवाविषयक बाबीसंदर्भात सखोल अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करेल.

सदर अभ्यास गटाची कालमर्यादा या शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन महिन्यांपर्यंत राहिल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

बा.ब.पिंगट
सहसचिव महाराष्ट्र शासन

F:\kp(GR).doc



संकेतांक क्रमांक 201411261815202227

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव
मा.उपमुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव
मा.मंत्री/राज्यमंत्री (जलसंपदा विभाग)यांचे खाजगी सचिव
सचिव (जसं) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
सर्व अधिक्षक अभियंता, तथा परिमंडळीय अधिकारी पुणे, सातारा, औरंगाबाद, अमरावती, ठाणे, नाशिक